**श्रीक्षेत्र कौंडण्यपूर, ता.तिवसा, जि.अमरावती परिसरात पायाभूत नागरी सुविधा देण्यासाठी विकास आराखडा निधी वितरीत करणेबाबत...**

महाराष्ट्र शासन
नियोजन विभाग
शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१२/प्र.क्र.१०/का.१४४४
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: **२८** ऑगस्ट, **२०१४**

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१२/प्र.क्र.१०/का.१४४४, दिनांक ३ डिसेंबर, २०१२.
२) शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१२/प्र.क्र.६२/का.१४४४,दिनांक १६ फेब्रुवारी, २०१३.
३) शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१२/प्र.क्र.१०/का.१४४४, दिनांक २३ सप्टेंबर, २०१३.

**प्रस्तावना :-**

श्रीक्षेत्र कौंडण्यपूर, ता.तिवसा, जि.अमरावती परिसरात पायाभूत नागरी सुविधा देण्यासाठी शासन निर्णय, दिनांक ३ डिसेंबर, २०१२ अन्वये मान्यता देण्यात आलेल्या कामांसाठी विभागीय आयुक्त, अमरावती यांना सन २०१४-१५ या वित्तीय वर्षासाठी निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

श्रीक्षेत्र कौंडण्यपूर, ता.तिवसा, जि.अमरावती परिसरात पायाभूत नागरी सुविधा देण्यासाठीच्या आराखड्याचा कार्यालयीन खर्च, जाहिरात व प्रसिध्दी तसेच प्रकल्प सल्लागाराची फी, इत्यादी आवश्यक बाबीकरिता विभागीय आयुक्त, अमरावती यांना ₹१३.२० लक्ष निधी वितरित करण्यात येत आहे.

मात्र हा निधी स्वीय प्रपंजी खात्यात ठेवता येणार नाही.

या निधीचे उद्दिष्टनिहाय वाटप खालीलप्रमाणे आहे:-

| उद्दिष्ट निहाय बाबी | | रुपये हजारात |
|---|---|---|
| १३, कार्यालयीन खर्च | -- | ६० |
| २६,जाहिरात व प्रसिध्दी | -- | ६० |
| ३१,सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) | -- | १२,०० |
| | | ------------ |
| | **एकूण** | **१३,२०** |

सदरहू खर्च लेखाशिर्ष “मागणी क्रमांक ओ-८, ३४५२- पर्यटन, ०१-पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१-पर्यटन केंद्रे, (००)(१२) श्रीक्षेत्र कौंडण्यपूर, ता.तिवसा, जि.अमरावती परिसरात पायाभूत नागरी सुविधा (३४५२ २८९२) योजनांतर्गत योजना (दत्तमत)” याखाली खर्ची टाकण्यात यावा.

वर नमूद केलेल्या लेखाशिर्षांतर्गत झालेला प्रत्यक्ष खर्च व महालेखापाल कार्यालयाने नोंदविलेल्या खर्चाचा दरमहा ताळमेळ घालण्यात यावा. वितरीत केलेल्या निधीचे उपयोगीता प्रमाणपत्र शासनास तात्काळ सादर करावे.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४११/व्यय-८, दिनांक १४ ऑगस्ट,२०१४ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२८११५३२५०६१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jagtap Ramesh N

Digitally signed by Jagtap Ramesh N
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Jagtap Ramesh N
Date: 2014.08.28 12:48:01 +05'30'

**( र.ना.जगताप)**

कार्यासन अधिकारी,नियोजन विभाग

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ), महाराष्ट्र -१, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
३) विभागीय आयुक्त,अमरावती विभाग, अमरावती .
४) वित्त विभाग (व्यय-८)/(अर्थ-१६) मंत्रालय, मुंबई.
५) जिल्हाधिकारी, अमरावती.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
७) नियोजन विभाग, का.१४२४, मंत्रालय, मुंबई.
८) निवड नस्ती, का.१४४४, नियोजन विभाग, मुंबई.